डॉ. बंदोरवाला, कुष्ठरोग रुग्णालय, कोंढवा, पुणे येथील आहार सेवा, वस्त्रधुलाई सेवा, सुरक्षा रक्षक सेवा व स्वच्छता सेवा सुरु ठेवण्यासाठी मुदतवाढ देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय, क्रमांकः संकीर्ण २०२२/प्र.क्र.६२/आरोग्य-३

१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : २८ ऑगस्ट, २०२४.

वाचा :

१) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०२२/प्र.क्र.६२/आरोग्य-३ दि.२३ मार्च,२०२२

२) सहसंचालक, आरोग्य सेवा, कुष्ठरोग व क्षयरोग, पुणे यांचे पत्र क्रमांक-ससंआसे/कुष्ठवक्षय/कक्षभांडार/मुदतवाढ/प्रमा/१३१६९-७२/२४ दि.२१/०८/२०२४

**प्रस्तावना:**

डॉ. बंदोरवाला, कुष्ठरोग रुग्णालय, कोंढवा, पुणे येथील आहार सेवा, वस्त्रधुलाई सेवा, सुरक्षा रक्षक सेवा व स्वच्छता सेवा पुरविण्यासाठी उपरोक्त वाचा येथील अनुक्रमांक १, अन्वये सन २०२१-२२, सन २०२२-२३ व सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर रुग्णालयातील कंत्राटी सेवा सुरळीत सुरु ठेवण्यासाठी सदर प्रशासकीय मान्यतेस माहे जून, २०२४ ते मार्च, २०२५ पर्यंत मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे. त्याबाबत पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

## शासन निर्णय:

रुग्णालयातील कंत्राटी सेवा सुरळीत सुरु ठेवण्यासाठी नवीन ई-निविदेची प्रक्रिया पूर्ण करुन संबंधित पुरवठादारास पुरवठा आदेश देण्याच्या अटीच्या अधिन राहून डॉ. बंदोरवाला, कुष्ठरोग रुग्णालय, कोंढवा, पुणे येथील आहार सेवा, वस्त्रधुलाई सेवा, सुरक्षा रक्षक सेवा व स्वच्छता सेवा पुरविण्यासाठी उपरोक्त अनुक्रमांक १, अन्वये देण्यात आलेल्या प्रशासकीय मान्यतेस माहे जून, २०२४ ते माहे मार्च, २०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. सदरचा खर्च खालील लेखाशिर्षातून त्या त्या वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

"आहार व कंत्राटी सेवा यावर होणारा खर्च

२२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य,
(०१) (१०) कुष्ठरोग नियंत्रण पथके व रुग्णालय (२२१० ०६६५)
बाब १० - कंत्राटी सेवा,
१३ - कार्यालयीन खर्च
१९ - आहार"

४. सदर शासन निर्णय, शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दि.१७.४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८,भाग पहिला, उपविभाग-चार मधील अ.क्र.११, अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८२८१४५४१८१५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY DATTARAM MAHADESHWAR

Digitally signed by SANJAY DATTARAM MAHADESHWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=759d43d3ca03f08520a6d49169531e74206cd390898bbe0690fead8f00f6a3eb, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=09A8917EDE715503310B61D8A24357A945B188F3A254ABA25AC8365BB66E4EE8, cn=SANJAY DATTARAM MAHADESHWAR
Date: 2024.08.28 15:23:24 +05'30'

**(सं.द.महाडेश्वर)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल- १/२, महाराष्ट्र, (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
२. आयुक्त आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
३. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
४. सह संचालक, आरोग्य सेवा, (खरेदी कक्ष), मुंबई.
५. सर्व उपसंचालक, आरोग्य सेवा, पुणे
६. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, पुणे.
७. प्रशासक, डॉ. बंदोरवाला कुष्ठरोग रुग्णालय, कोंढवा, पुणे.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
९. वित्त विभाग (कोषागारे/ प्रशासन ५), मंत्रालय, मुंबई.
१०.अवर सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
११.निवडनस्ती (कार्यासन आरोग्य-३).